**महासंचालक, अँन्टी करप्शन ब्युरो, म.रा.,मुंबई यांच्या आस्थापनेवरील एकूण २० अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. पीएलएफ-०१२०/ प्र.क्र.८१/पोल-४**
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: ३० सप्टेंबर, २०२१

वाचा:- १) गृहविभाग, शासननिर्णयक्र.पीएलएफ-०१२०/ प्र.क्र.८१/पोल-४,दि.१८.०३.२०२१
२) सहायक पोलीस महानिरीक्षक (नि.व स.),पोलीस महासंचालक कार्यालय,म.रा.,मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/अँकब्यु/मु.वा./अस्थायी पदे/०६/२०१५, दि.२९.०७.२०२१
३) वित्त विभाग,शासन निर्णय क्र.पदनि२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क.,दि.१०.०८.२०२१

**शासन निर्णय :-**

महासंचालक,अँन्टी करप्शन ब्युरो,म.रा.,मुंबई यांच्या आस्थापनेवरील एकूण २० वाहन चालक अस्थायी पदांना संदर्भ क्र १ येथील शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२१ ते दि.३१.०८.२०२१ पर्यत वित्त विभागाने दिलेल्या अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात आलेली आहे. उपरोक्त नमूद संदर्भ क्र. ३ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेले आहे. उपरोक्त संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये, महासंचालक, अँन्टी करप्शन ब्युरो, म.रा., मुंबई यांच्या आस्थापनेवरील एकूण २० अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२१ पासून पुढील कालावधीकरीता मुदतवाढ देणेबाबतचा प्रस्ताव सादर केलेला आहे. त्यानुषंगाने या शासन निर्णयासोबतच्या सहपत्रात नमुद केलेल्या महासंचालक, अँन्टी करप्शन ब्युरो, म.रा.,मुंबई यांच्या आस्थापनेवरील एकूण २० वाहन चालक अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ पर्यंत खालील अटीच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) प्रस्तावित करण्यात आलेल्या पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा जास्त काळ रिक्त नाही व अस्थायी पदे ज्या कारणासाठी, अटी व शर्तीचे अधीन राहून मंजूर केली आहेत त्यांचे पालन करण्यात आले आहे.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.१०.०८.२०२१ नुसार विहित केलेल्या अटीचे व शर्तीचे कटाक्षाने पालन करण्यात येईल व त्याप्रमाणे कार्यवाही करण्यात येईल.
३) दरम्यानच्या काळात अस्थायी पदांच्या सुधारीत आकृतीबंध निश्चिती करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही. तसेच, सुधारीत आकृतीबंधाचा प्रस्ताव तातडीने वित्त विभागास सादर करण्याचे नियोजन करुन त्वरीत कार्यवाही करण्याच्या सूचना संबंधितांना द्याव्यात. त्यामुळे अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतन व भत्यांचा प्रश्न निर्माण झाल्यास ती जबाबदारी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य मुंबई यांची राहील.

२. सदर प्रकरणी होणारा खर्च गृह विभाग, मागणी क्रमांक : बी-१ "२०५५-पोलीस- १०१(३) अँन्टी करप्शन ब्युरो" या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/ आ.पु.क., दि.१०.०८.२०२१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९३०१८४४५४४८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशा नुसार व नांवाने,

Shirish Nagorao Mohod

Digitally signed by Shirish Nagorao Mohod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66fda7e745bb4928b21046cecbf7bd8f40e4950e0a99497fa2862e1d37ed75b7, serialNumber=beb4df218cab93811ed9522b6f8ac2546899b499eb80512bfa5ec939466fb620, cn=Shirish Nagorao Mohod
Date: 2021.10.01 11:42:01 +05'30'

**( शिरीष मोहोड )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
२. महासंचालक,ॲन्टी करप्शन ब्युरो,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. महालेखापाल,महाराष्ट्र१ (लेखा व अनुज्ञेयता),मुंबई-१.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
६. वित्तविभाग (व्यय-७/वित्तीयसुधारणा-१),मंत्रालय, मुंबई.
७. कार्यासनअधिकारी (पोल-३),गृहविभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती/गृह विभाग, पोल-४.

**महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील २० अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.**

गृह विभाग, शासन निर्णय क्र.पीएलएफ-०१२०/प्र.क्र.८१/पोल-४, दि. ३० सप्टेंबर, २०२१ सोबतचे विवरणपत्र

| अ. क्र. | पदनाम | पद संख्या | पद निर्मितीचा शासन निर्णय | अस्थायी पदांना मुदतवाढ मिळाल्याचा यापुर्वीचा शासन निर्णय |
|---|---|---|---|---|
| १ | पोलीस शिपाई वाहन चालक | ८ | क्र.एमटीएस-१०९२/४३०/(२९)/पोल-४, दि.०८.०७.१९९३ | शा.नि.क्र.पीएलएफ-०१२०/प्र.क्र.८१/ पोल-४, दि.१८.०३.२०२१ |
| २ | पोलीस शिपाई वाहन चालक | ६ | क्र.एमटीएस-१०९३/२४००/(२५)/पोल-४, दि.१२.०९.१९९५ | |
| ३ | पोलीस शिपाई वाहन चालक | ६ | क्र.एमटीएस-१०९६/२७२३/न.बा.१८/पोल-४, दि.०१.०८.१९९७ | |
| | **एकूण** | **२०** | | |